**श्री.धीरज मिश्रा, शासकीय क्रीडा मार्गदर्शक यांना जर्मनी या देशाचा परदेश दौरा करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः विदौरा-२०२३/प्र.क्र.४८/क्रीयुसे-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: १० मे, २०२३.

**वाचा -**

श्री.फ्रान्सिस्को क्विनोन्स (Francisco Quinones),मॅनेजर युथ फुटबॉल,एफ.सी.बायर्न, म्युनिच, जर्मनी यांचे दि.३०मार्च ,२०२३ रोजीचे पत्र

**प्रस्तावना-**

राज्यात फुटबॉल खेळाचा प्रचार व प्रसार करण्यासाठी राज्य शासन पावले उचलत आहे. याचाच एक भाग म्हणून राज्य शासनाने (क्रीडा विभाग) फुटबॉल क्लब बायर्न, म्युनिच, जर्मनी या जगप्रसिध्द व फुटबॉल स्पर्धांमध्ये अत्यंत यशस्वी असलेल्या संस्थेसोबत फुटबॉल या खेळाच्या प्रशिक्षण व विकासाच्या अनुषंगाने सहकार्य करार करण्यात आलेला आहे. त्यानुसार राज्यातील १४ वर्षाखालील २० खेळाडू,१ क्रीडा मार्गदर्शक, १ फुटबॉल प्रशिक्षक व १ व्यवस्थापक यांना फुटबॉल खेळाच्या अद्ययावत प्रशिक्षणाकरीता जर्मनी येथे पाठविण्यास शासन निर्णय,दि. १५ मार्च, २०२३ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तसेच, शासन निर्णय, दिनांक २९ मार्च, २०२३ अन्वये सदर प्रशिक्षण खर्चासाठी आवश्यक रु.१३०.०० लक्ष इतक्या खर्चास मंजूरी देण्यात आलेली आहे. यानुषंगाने एफ.सी बायर्न क्लब व राज्य शासन यांच्या संयुक्त विद्यमाने राज्यभरात महाराष्ट्र फुटबॉल कप स्पर्धा आयोजित करून त्यामध्ये २० खेळाडूंची निवड करण्यात आली आहे.

एफ.सी बायर्न क्लब यांनी संदर्भाधिन पत्रान्वये निवड केलेल्या २० खेळाडूंची नावे तसेच त्यांच्या जर्मनी येथील प्रशिक्षणाबाबतची माहिती सादर करून प्रशिक्षणाकरिता जर्मनी येथे आमंत्रित केले आहे. त्यानुसार सदर २० खेळाडू,१ क्रीडा मार्गदर्शक, १ फुटबॉल प्रशिक्षक व १ व्यवस्थापक यांना करारानुसार जर्मनी येथील प्रशिक्षणासाठी पाठविण्याचा प्रस्ताव आयुक्त, क्रीडा यांनी दि.१७.४.२०२३

अन्वये सादर केला आहे. करारानुसार या २० खेळाडू व प्रशिक्षक , मार्गदर्शक व व्यवस्थापक यांच्या दौऱ्याचा खर्च फुटबॉल क्लब बायर्न, म्युनिच, जर्मनी यांच्याकडून केला जाणार आहे.

या दौऱ्यामध्ये श्री.धीरज मिश्रा या शासकीय सेवेतील क्रीडा मार्गदर्शक यांचा समावेश असून सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय दि.१.२.२०२१ मधील विदेश दौऱ्यासंदर्भातील तरतुदींनुसार त्यांचा प्रस्ताव सामान्य प्रशासन विभागास शिफारस समितीच्या मान्यतेसाठी सादर केला होता. त्यास मान्यता प्राप्त झाली असून त्यानुसार दि.१८ मे,२०२३ ते दि.२६ मे,२०२३ या कालावधीत जर्मनी (एफ.सी. बायर्न,म्युनिच) येथे प्रशिक्षणासाठी उपस्थित राहणेकरीता श्री.धीरज मिश्रा, शासकीय क्रीडा मार्गदर्शक, क्रीडा प्रबोधिनी,पुणे यांच्या परदेश दौऱ्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

राज्य शासनाने एफ.सी. बायर्न, म्युनिच (Munich) जर्मनी या संस्थेसोबत प्रशिक्षणाबाबत करार केला असून त्यानुसार निवड केलेल्या २० खेळाडुंना संदर्भाधिन पत्रान्वये प्रशिक्षण शिबिराकरिता जर्मनी येथे आंमत्रित केले आहे. यानुषंगाने श्री.धीरज मिश्रा, शासकीय क्रीडा मार्गदर्शक, क्रीडा प्रबोधिनी,पुणे यांना सदर २० खेळाडूंसोबत जाण्यासाठी जर्मनी देशाचा परदेश दौरा करण्याकरिता याव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत परदेश दौरा दिनांक १८ मे, २०२३ ते दि.२६ मे, २०२३ (प्रवासासह )या कालावधीसाठी राहील. सदर परदेश दौरा पुर्ण झाल्यानंतर विदेश दौऱ्यासंबधीचा अहवाल प्रशासकीय विभागास आणि सामान्य प्रशासन विभागास सादर करणे आवश्यक राहील. तसेच विदेश दौऱ्यात प्राप्त केलेल्या ज्ञानाचा / कौशल्याचा उपयोग अन्य अधिकारी / कर्मचारी तसेच खेळाडू यांना प्रशिक्षण देण्यासाठी करावा.

३. सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग अनौ.सं.क्रं.४२/२०२३/११, दि.९.५.२०२३ अन्वये मिळालेल्या शिफारस समितीच्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे. सदर परदेश दौऱ्यास केंद्रशासनाच्या संबधित मंत्रालयांची (विदेश/वित्त/क्रीडा) आवश्यकतेप्रमाणे मान्यता घ्यावी.

४. सदर श्री.मिश्रा यांच्या शासकीय दौऱ्याचा संपूर्ण खर्च करारानुसार फुटबॉल क्लब बायर्न, म्युनिच, जर्मनी या संस्थेकडून केला जाणार आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५१०१६११३२६६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

RANSING
ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=9651a3c25d5e1f106e47059f72760ff520f9b00f67c3e9186e40ed4bd4fbaee6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=41EC78BC14804BABDC24C7FD31BA9FBF63804F499D4335774E27423E40136397, cn=RANSING ANANDRAO DERE
Date: 2023.05.10 16:12:38 +05'30'

**(रणसिंग डेरे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. सचिव, क्रीडा मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली
२. सचिव, अर्थ मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली,
३. सचिव, परराष्ट्र मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
५. अतिरिक्त मुख्य सचिव (मुख्यमंत्री सचिवालय), मंत्रालय, मुंबई
६. अतिरिक्त मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७. अतिरिक्त मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
९. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०.उपसचिव, क्रीडा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.सह संचालक, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य,पुणे.